# महाराष्ट्र शासन

**क्रमांक :**मावज-२००९/प्र.क्र.२८७/०९/३४-अ,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
**दिनांक :** १६.९.२०१०

## आदेश

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील श्री. म. ठ. गावीत, जिल्हा माहिती अधिकारी, जळगांव यांना उपसंचालक (माहिती), गट-अ (वरिष्ठ) ( वेतन बँड १५६००-३९१०० ग्रेड वेतन ६६००) या पदावर पुढील अटींच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना उपसंचालक (प्रकाशने), मंत्रालय, मुंबई. या पदावर करण्यात येत आहे.

१) श्री. गावीत यांची उपसंचालक (माहिती) गट-अ (वरिष्ठ) पदावरील तदर्थ पदोन्नती त्यांचे विरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही, या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) श्री. गावीत यांची तदर्थ पदोन्नती मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.

३) सदर तदर्थ पदोन्नती प्रथम ११ महिने अथवा संबधीत अधिकारी प्रतिनियुक्तीवरुन परत येईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीपर्यन्त असेल.

४) या तदर्थ पदोन्नतीमुळे श्री. गावीत यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

श्री. म. ठ. गावीत, जिल्हा माहिती अधिकारी, जळगांव यांना उपसंचालक (माहिती), गट-अ (वरिष्ठ) या पदावर तदर्थ पदोन्नती दिल्यामुळे जिल्हा माहिती अधिकारी, जळगांव या रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेश होईपर्यंत श्री.प्र.शे.वसावे, जिल्हा माहिती अधिकारी, नंदूरबार यांच्याकडे सोपविण्यात यावा.

हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००९१६२००७३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(कुं.न.घाटगे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परिक्षा), मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (माहिती)(वृत्त व जनसंपर्क),माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
विभागीय माहिती कार्यालय, नाशिक,
श्री. म. ठ. गावीत, जिल्हा माहिती अधिकारी , जळगांव,
जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, जळगांव
जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, नंदूरबार
सामान्य प्रशासन विभाग/का.१२, १६-ब व ३४, **निवड नस्ती (का.३४-अ)**